**मौजे कुंडल ता. पलूस जि. सांगली येथील “कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)” या अकादमीकरिता सन २०१७-१८ मध्ये सहाय्यक अनुदाने (योजनांतर्गत) वितरित करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१७/प्र.क्र.८२/फ-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- ०६ मे, २०१७

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/चाबाप्र/प्र.क्र.१३/१७२/१७-१८, दि.०३.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१७-१८ करिता “कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी वने, कुंडल (२४१५१०६८)” या लेखाशीर्षाअंतर्गत एकूण रु.५००.०० लक्ष इतका निधी मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ येथील दि.०३.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये २४१५१०६८ या संकेतांकाअंतर्गत रु.५००.०० लक्ष रक्कमेचा सहायक अनुदाने वितरणाचा प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

२. वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये, सन २०१७-१८ करिता महसूली खर्च शीर्षांतर्गत योजनांकरिता ८० % मर्यादेत निधी वितरित करण्याकरिता मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने, संदर्भ क्र.१ येथील दि.०३.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेता “कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी वने, कुंडल (२४१५१०६८)” या लेखाशिर्षाअंतर्गत कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे कुंडल या संस्थेकरिता अर्थसंकल्पीत निधीच्या ८० टक्के मर्यादेत **रु.४००.०० लक्ष (३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) - रु.२००.०० लक्ष व ३६, सहायक अनुदाने (वेतन) - रु.२००.०० लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील निधी खर्च करताना खालील अटी व शर्ती यांची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी :-

I) संस्थेने आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये मंजूर व वितरित अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

II) सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे. तसेच वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

III) संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

IV) कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे.कुंडल या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

४. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-७, प्रधानशीर्ष - २४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण, २७७, शिक्षण, (००) (०२) कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी वने, कुंडल (२४१५१०६८) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०६१५४३३७९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.06 16:02:15 +05'30'

**( डी.एल.थोरात )**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) / (कार्मिक), म.रा.नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
५) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महासंचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे.कुंडल, ता.पलूस, जि.सांगली.
७) प्राचार्य, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), मौजे.कुंडल, ता.पलूस, जि.सांगली.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सांगली/कोल्हापूर/पुणे
१२) फ-९/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

विवरणपत्र - १

शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१७/प्र.क्र.८२/फ-२, दि.०६.०५.२०१७

मासिक निधी विवरणपत्र सन २०१७-१८

योजनेचे नांव :- मौजे कुंडल ता. पलूस जि. सांगली येथील "कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)" या अकादमीकरिता सन २०१७-१८ मध्ये सहाय्यक अनुदाने (योजनांतर्गत) वितरित करणे. (२४१५१०६८)

(रु.लाखात)

| सविस्तर शिर्ष | मागणी केलेली रक्कम | मे २०१६ | जून २०१६ | जुलै २०१६ | ऑगस्ट २०१६ | सप्टेंबर २०१६ | ऑक्टोबर २०१६ | नोव्हेंबर २०१६ | डिसेंबर २०१६ | जानेवारी २०१७ | फेब्रुवारी २०१७ | मार्च २०१७ | एकूण वाटप केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २५०.०० | ३३.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १६.०० | १६.०० | १६.०० | **२००.००** |
| ३६, सहायक अनुदाने (वेतन) | २५०.०० | ३३.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १७.०० | १६.०० | १६.०० | १६.०० | **२००.००** |
| **एकूण** | **५००.००** | **६६.००** | **३४.००** | **३४.००** | **३४.००** | **३४.००** | **३४.००** | **३४.००** | **३४.००** | **३२.००** | **३२.००** | **३२.००** | **४००.००** |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.05.06 16:02:29 +05'30'

**(डी.एल.थोरात)**

सह सचिव

महसूल व वन विभाग